ग्रामपंचायतींच्या हद्दीतील रस्त्यावरील दिवे हायमास्टचे न बसविण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन परिपत्रक क्रमांकः पदिदे -२०२१/प्र.क्र.३८/वित्त-२

बांधकाम भवन,२५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.

दिनांक : २८ जानेवारी, २०२२.

वाचा -

१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र.व्हीपीए-२०८५/सीआर-१९४०/२२, दि.३० जानेवारी, १९९०.

२) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२६०३/प्र.क्र.१९९२/पंरा-४, दिनांक २२ सप्टेंबर, २००३.

३) ग्रामविकास विभाग, शासन परिपत्रक क्र. पदिवे-२०२१/प्र.क्र.२४/वित्त-२, दि.१५ नोंव्हेंबर, २०२१.

४) ग्रामविकास विभाग, परिपत्रक समक्रमांक, दिनांक ०८ डिसेंबर, २०२१.

## शासन परिपत्रक

संदर्भाधीन क्र.४ येथील दिनांक ०८ डिसेंबर, २०२१ च्या शासन परिपत्रकान्वये ग्रामपंचायतींच्या हद्दीतील रस्त्यांवरील पथदिव्यांच्या विद्युत देयकाची रक्कम नियंत्रणात ठेवण्यासाठी व विजेच्या वापरात बचत व काटकसर करणे आवश्यक असल्याने रस्त्यावरील दिवे हायमास्टचे बसविण्यात येऊ नयेत असा निर्णय शासनाने घेतला आहे. शासनाने हायमास्ट न बसविण्याचा निर्णय घेण्यापूर्वी काही जिल्हा परिषदांनी हायमास्ट बसविण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे व त्यासाठी निधी उपलब्ध करुन दिला आहे व निविदा प्रक्रिया सुरु करण्यात आली आहे . अशा प्रकरणामध्ये हायमास्ट बसविण्यास परवानगी देण्याची विनंती लोक प्रतिनिधी तसेच जिल्हा परिषदांकडून शासनाकडे करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. आता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

२. ग्रामपंचायतीच्या हद्दीतील रस्त्यांवरील पथदिवे हायमास्टचे न बसविण्याबाबत शासनाने दिनांक ८.१२.२०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये निर्णय घेण्यापूर्वीच हायमास्ट बसविण्यास प्रशासकीय मान्यता देवून निविदा काढण्यात आलेल्या आहेत अशा प्रकरणी वीज बिलांमध्ये वाढ होणार नाही या अटींच्या

अधिन राहून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना हायमास्ट बसविण्याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

३. ग्रामपंचायतीच्या हद्दीतील रस्त्यांवरील पथदिवे हायमास्टचे बसविण्यास वरील परिच्छेदामध्ये नमूद केल्याप्रमाणे सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मान्यता देण्यात येत असून कोणत्याही परिस्थितीत ही बाब पुर्वोदोहरण म्हणून समजण्यात येणार नाही.

४. ग्रामपंचायतींच्या हद्दीतील रस्त्यांवरील पथदिव्यांच्या विद्युत देयकाची रक्कम नियंत्रणात ठेवण्यासाठी व विजेच्या वापरात बचत व काटकसर करणे आवश्यक असल्याने आवश्यक त्या उपाययोजना करण्याच्या सूचना सर्व संबंधित ग्रामसेवक /सरपंच यांना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी द्याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२८१७४०३७४४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN KISAN KUDAL

Digitally signed by NARAYAN KISAN KUDAL
DN: cn=NARAYAN KISAN KUDAL, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=narayan.kudal@gov.in, c=IN
Date: 2022.01.31 12:22:57 +05'30'

(ना. कि. कुदळ)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग.
६. विभागीय आयुक्त (सर्व).
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
८. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, ग्रामविकास विभाग.
९. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत), जिल्हा परिषद (सर्व).
१०.गटविकास अधिकारी, पंचायत समिती सर्व (जिल्हा परिषदामार्फत).

११.ग्रामसेवक/सरपंच, सर्व ग्रामपंचायत (जिल्हा परिषद / गटविकास अधिकारी यांचेमार्फत).

१२.निवड नस्ती (वित्त-२).